सार्वत्रिक बदल्या-२०१७

**निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब).**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-१२१७/प्र.क्र.५४/राउशु-१,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ०४ मे, २०१७.

**शासन आदेश-**

निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील पुढील अधिकाऱ्यांनी त्यांच्या सध्याच्या पदावर तीन वर्षांचा कालावधी पूर्ण केला असल्यामुळे त्यांच्या बदल्या करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील **स्तंभ (४)** मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अधिकाऱ्याचे नाव** | **सध्याच्या पदस्थापनेचे ठिकाण** | **बदलीनंतरच्या पदस्थापनेचे ठिकाण** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | श्री. व्ही. के. थोरात | निरीक्षक, राउशु, आर विभाग, मुंबई उपनगरे | निरीक्षक, राउशु, एफ विभाग, मुंबई शहर |
| २ | श्री. एस. जे. मोरे | निरीक्षक, राउशु, एफ विभाग, मुंबई शहर | निरीक्षक, राउशु, अलिबाग, जि. रायगड-अलिबाग |

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने या बदल्या करण्यात येत आहेत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता आयुक्त, राउशु यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे

अ) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेले अधिकारी त्यांच्या सध्याच्या पदावरून कार्यमुक्त होऊन रूजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. सदर अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच त्यांचे पुढील वेतन व भत्ते रूजू होणाऱ्या पदावरच काढण्यात येतील याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

ब) संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

४. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५०४१२१३४५१७२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip J Shedmekhe

Digitally signed by Dilip J Shedmekhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, serialNumber=5603a72ffdb1ef7b928b7c0a641bd1c8ef4b36aa6a8fd21a86271888a24f9803, cn=Dilip J Shedmekhe
Date: 2017.05.04 12:15:43 +05'30'

(दि. ज. शेडमेखे)
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति-

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) विभागीय उपायुक्त, कोकण विभाग, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, (मुंबई शहर/ मुंबई उपनगरे/ रायगड).
६) अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (मुंबई शहर/ मुंबई उपनगरे/ रायगड) (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
७) संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
८) निवडनस्ती (राउशु-१).